**राज्य शासकीय सेवानिवृत्त अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी पेंशन अदालत आयोजित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : सेनिवे-२०१८/प्र.क्र.२८५/सेवा-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ५ सप्टेंबर, २०१८

**शासन परिपत्रक**

केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतनधारक कल्याण विभागाचे दि.१८.७.२०१८ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनानुसार संपूर्ण देशामधील संबंधित राज्य / केंद्र शासित प्रदेशांमध्ये "पेंशन अदालत" आयोजित करण्याचे सूचित केले आहे. त्या अनुषंगाने राज्य शासनाच्या वतीने संचालक, लेखा व कोषागारे यांचेमार्फत "पेंशन अदालत" आयोजित करण्यात येत आहे. दि.१८.९.२०१८ रोजी खालील नमूद ठिकाणी राज्य शासनातर्फे पेंशन अदालतचे आयोजन करण्यात येत आहे. सदर पेंशन अदालतीकरिता मा.महालेखाकार, मुंबई यांचे प्रतिनिधी उपस्थित राहणार आहेत.

मा.महालेखाकार, मुंबई कार्यालयामार्फत प्राप्त झालेली प्रलंबित निवृत्तीवेतन प्रकरणांची यादी www.mahakosh.gov.in या संकेतस्थळावर Circulars and Orders या Tab मध्ये माहितीकरिता प्रसिध्द करण्यात आली आहे. सदर यादीतील निवृत्तीवेतन प्रकरणे मा.महालेखाकार, मुंबई व नागपूर कार्यालयाने त्रुटींची पूर्तता करणेकरिता संबंधित कार्यालय प्रमुखांकडे परत पाठविलेली आहेत. अद्यापही सदर प्रकरणे कार्यालय प्रमुखांचे स्तरावर प्रलंबित आहेत.

प्रलंबित निवृत्तीवेतन प्रकरणांच्या यादीच्या अनुषंगाने संबंधित कार्यालय प्रमुख यांनी त्यांचेशी संबंधित प्रकरणांबाबत संबंधित सेवानिवृत्त अधिकारी / कर्मचारी यांच्याशी तातडीने संपर्क साधून त्यांच्या त्रुटी निवारणाच्या अनुषंगाने पेंशन अदालतीस हजर रहावे व संबंधित अधिकारी / कर्मचारी यांस हजर राहण्याबाबत कळवावे. तसेच यादीत नमूद अधिकारी / कर्मचारी यांनीही आपल्या कार्यालय प्रमुखांशी संपर्क साधून दि.१८.९.२०१८ रोजीच्या पेंशन अदालतीस उपस्थित रहावे. राज्य शासनाच्या इतर निवृत्तीवेतनधारकांनाही निवृत्तीवेतन प्रकरणी तक्रार असल्यास त्यांनीही आपल्या कार्यालय प्रमुखांशी संपर्क साधून तक्रारींसह सदर पेंशन अदालतीमध्ये उपस्थित रहावे.

मुंबई

| | | |
|---|---|---|
| दिनांक | : | १८ सप्टेंबर, २०१८. |
| वेळ | : | सकाळी १०.३० ते पूर्ण दिवस |
| स्थळ | : | पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मिनी थिएटर, प्रभादेवी, मुंबई. |

नागपूर

| | | |
|---|---|---|
| दिनांक | : | १८ सप्टेंबर, २०१८. |
| वेळ | : | सकाळी ९ ते पूर्ण दिवस |
| स्थळ | : | साई सभागृह, गांधी नगर, नागपूर. |

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९०५१७३३३१६००५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2018.09.06 15:18:05 +05'30'

**(अनुदीप दिघे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई,
९) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक/अमरावती
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१४) राज्यपालांचे सचिव,
१५) मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१६) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
१७) *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
१८) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
१९) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
२०) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२१) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२२) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२३) *प्रबंधक, मुंबई महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण /नागपूर/औरंगाबाद
२४) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
२५) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
२६) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ३२
२७) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.
२८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ३२.
२९) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०

३०) कार्यवाह, बृहन्मुंबई पेन्शनर्स असोसिएशन, वर्ग क्र.२१, तळ मजला, छबिलदास हायस्कूल, वनमाळी हॉलसमोर, दादर (प), मुंबई-४०० ०२८.
३१) अध्यक्ष, महाराष्ट्र स्टेट गव्हर्नमेंट पेंशनर्स असोसिएशन बेळगाव, १०९१, अनंतशयन गल्ली, लक्ष्मी निवास, दुसरा मजला, बेळगांव.
३२) मंत्रालयातील सर्व विभाग,
३३) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
३४) सर्व विभागीय आयुक्त,
३५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३६) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
३७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
३८) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३९) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,
४०) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण),
४१) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई,
४२) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक,
४३) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक,
४४) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
४५) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी,
४६) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला,
४७) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
४८) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर,
४९) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड,
५०) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर,
५१) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १
५२) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २०
५३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४
५४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३
५५) इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५
५६) नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१
५७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८
५८) वित्त विभागातील सर्व कार्यासने,
५९) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

*पत्राद्वारे.